**पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे या कार्यालयाचे प्रशासकीय नियंत्रण मुख्य अभियंता (पा) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्याकडे सोपविण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## जलसंपदा विभाग

**शासन निर्णय क्रमांक :- आढावा-२०२१/प्र.क्र.७२/आ.(पुनर्रचना),**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ०४ मे, २०२२.

**वाचा:-**

१) WRD-Restructuring/2009/(16/09)/WR (Est.), Dt.12/10/2010

२) जलसंपदा विभाग,शासन निर्णय क्र.आढावा- २०१७/प्र.क्र.१४२/२०१७/आ(प्रशि) दिनांक १३/०७/२०१७.

३) अधीक्षक अभियंता व संचालक, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय,पुणे यांचे पत्र क्र.पासविसं/प्रलि-१/४१३०/२०२१ दिनांक २८.१०.२०२१

४) महासंचालक,संकल्पन,प्रशिक्षण,जलविज्ञान,संशोधन व सुरक्षितता,नाशिक यांचे पत्र क्र.मसं/संप्रजसंसु/आस्था-२/१९५/२०२१ दिनांक ०८.१०.२०२१

**प्रस्तावना:-**

जलसंपदा विभागांतर्गत पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे या कार्यालयाचे संनियंत्रण संदर्भ क्रमांक (२) येथील शासन निर्णयान्वये महासंचालक, संकल्पन, प्रशिक्षण, जलविज्ञान, संशोधन व सुरक्षितता, नाशिक (DTHRS) यांच्याकडे सोपविण्यात आले होते. तथापि, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे या कार्यालयाकडे सोपविण्यात आलेली कामे व त्याचे कार्यक्षेत्र हे संपूर्ण महाराष्ट्रभर असल्याने सदर संचालनालयाचे प्रशासकीय नियंत्रण थेट शासनाच्या नियंत्रणाखाली आणण्याबाबत शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय** : -

जलसंपदा विभागांतर्गतच्या अधीक्षक अभियंता व संचालक, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे या कार्यालयाकडे सोपविण्यात आलेली कामे परिणामकारकरित्या होण्याच्या दृष्टीने त्यांचे प्रशासकीय नियंत्रण मुख्य अभियंता (पा) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्याकडे सोपविण्यात येत आहे.

२. सदर संचालनालयाच्या केवळ प्रशासकीय नियंत्रणात बदल करण्यात येत असून मंजूर आस्थापना, कार्यालयीन जागा व तांत्रिक नियंत्रणात कोणताही बदल करण्यात आलेला नाही.

३. उपरोक्त प्रमाणे होणाऱ्या बदलाबाबत आवश्यक ती सर्व कार्यवाही अधीक्षक अभियंता व संचालक, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे यांनी करावी व केलेल्या कार्यवाहीचा अनुपालन अहवाल शासनास त्वरीत सादर करावा. तसेच, मुदतवाढीचे प्रस्ताव सादर करताना आवश्यक ते बदल करुन मुदतवाढीचे प्रस्ताव शासनास सादर करावेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२२०५०४१८१०२५७६२७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

KAILAS VINAYAKRAO BILONIKAR

Digitally signed by KAILAS VINAYAKRAO BILONIKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9a27dfb4b6256843f8c1809ab4420a59790d825d1fe9528b0173f1603963ddb7, pseudonym=BCF91AD2CBD5640CFA1DAB00655BEAE83A361F00, serialNumber=05EE2306C341BA74D47D58063086FC4D71937218B757CE53F4397E7F31F05BFE, cn=KAILAS VINAYAKRAO BILONIKAR
Date: 2022.05.04 18:11:39 +05'30'

**(कैलास बिलोणीकर)**
**शासनाचे सह सचिव**

**प्रत:-**

१) अप्पर मुख्य सचिव,जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) सचिव (ज.सं.व्य. व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) महालेखापाल १ / २, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/ नागपूर.
५) महालेखापाल १ / २, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा) मुंबई/ नागपूर.
६) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७) महासंचालक, संकल्पन, प्रशिक्षण, जलविज्ञान, संशोधन व सुरक्षितता, नाशिक.
८) सर्व कार्यकारी संचालक, पाटबंधारे विकास महामंडळ
९) मुख्य अभियंता (पा)व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) सह सचिव (सेवा)/उप सचिव (आस्था)/उप सचिव (प्रशा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) अधीक्षक अभियंता व संचालक, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे.
१२) कार्यकारी अभियंता, प्रशासन संगणकीकरण विभाग, पुणे.
(कार्यालयात झालेल्या बदलाची नोंद घेण्यास्तव अग्रेषित)
१३) कार्यासन आस्थापना (पुनर्रचना) संग्रहार्थ.